**फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन राज्यात व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या संस्थेस शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून फार्म.डी हा अभ्यासक्रम ३० प्रवेशक्षमतेसह सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.....**

**सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णुपुरी,नांदेड**

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्रशिक्षण विभाग

**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.६०२/तांशि-४**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग

हुतात्मा राजगुरू चौक,मुंबई-४०० ०३२

दिनांक: ०९ मार्च, २०१७.

**वाचा :-** १) फार्मसी कौंसिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ५०-७५४/२०१५-PCI/२२२१२-९६, दिनांक ०९.०८.२०१६

२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २/एनजीसी / फार्म.डी/२०१६/२२९८, दिनांक २९.११.२०१६.

**प्रस्तावना :**

उपरोक्त वाचा १) येथील पत्रान्वये फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णुपुरी, नांदेड-४३१ ६०६ या संस्थेस ३० प्रवेशक्षमतेचा फार्म.डी हा अभ्यासक्रम सुरु करण्यास काही अटींच्या अधीन राहून मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी उपरोक्त वाचा २) येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णुपुरी, नांदेड-४३१ ६०६ या संस्थेस ३० प्रवेशक्षमतेचा फार्म.डी हा अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:** फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णुपुरी, नांदेड-४३१ ६०६ या संस्थेस फार्म.डी हा अभ्यासक्रम ३० प्रवेशक्षमतेसह सुरु करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेचे प्रवेक्षक्षमता वर नमुद केल्याप्रमाणे राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

५) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

६) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

७) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत.तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके  फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे.  तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे .तसेच विद्यार्थ्यांना फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांच्या  मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

१०) याशिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३०९१६१०१७२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Maruti Morve
Date: 2017.03.17 16:51:37 +05'30'

**( म.मा.मोरवे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२.सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय , औरंगाबाद (तंत्र शिक्षण संचालकांमार्फत)
३.संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ,स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड (तंत्र शिक्षण संचालकांमार्फत)
४.प्राचार्य, सहयोग सेवाभावी संस्थेचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, विष्णुपुरी, नांदेड-४३१ ६०६
५.सचिव, फार्मसी काउन्सिल ऑफ इंडीया, कम्बाईंड काउन्सिल्स बिल्डिंग , टेम्पल लेन, कोटला रोड, ऐलान-ए-गालिब मार्ग, पो.बॉ. नं. ७०२०, नवी दिल्ली-११० ००२.
६.सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
७.निवड नस्ती/तांशि-४